महाराष्ट्र शिक्षण सेवा ( प्रशासन शाखा) गट-ब मधील अधिकाऱ्यांच्या प्रशासकीय बदल्या- उपशिक्षणाधिकारी व तत्सम पदे.

**महाराष्ट्र शासन**
**शालेय शिक्षण व क्रीडा विभाग**
**शासन आदेश क्रमांकः बदली ३११८/प्र.क्र.२२२/प्रशा-२**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक: १२ डिसेंबर, २०१८

वाचा:- शा.शि.व क्री.वि., शासन निर्णय.क्र.ईएसटी-३९१७/प्र.क्र.४६/प्रशा-२, दिनांक १७.०३.२०१७

**शासन आदेश-**

महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ हे दिनांक ०१ जुलै, २००६ पासून अंमलात आले आहेत. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ६ नुसार बदली करण्याबाबत सक्षम प्राधिकारी घोषित करण्यात आले आहेत. तसेच या कलमाच्या परंतुक २ नुसार बदली करणाऱ्या सक्षम प्राधिकाऱ्याला, सर्वसाधारण किंवा विशेष आदेशाद्वारे, या कलमाखाली त्याचे अधिकार त्याच्या कोणत्याही दुय्यम प्राधिकाऱ्याकडे सोपविता येतील, अशी तरतूद करण्यात आलेली आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्र शिक्षण सेवा गट-अ व गट-ब मधील विविध संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्यांचे अधिकार प्रत्यार्पित करण्याचा निर्णय दिनांक ३० मे, २०१५ च्या शासन निर्णयाद्वारे घेण्यात आलेला आहे.

२. महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील नियम ४ (४) दोन व नियम ४(५) मधील तरतुदीस अनुसरुन प्रशासकीय कारणास्तव पुढील अधिकाऱ्यांच्या बदलीचा प्रस्ताव नागरी सेवा मंडळासमोर सादर करण्यात आला होता. नागरी सेवा मंडळाच्या शिफारशीस अनुसरून सक्षम प्राधिकाऱ्यांनी व लगतपूर्व वरिष्ठ प्राधिकाऱ्यांनी दिलेल्या पूर्व मान्यतेनुसार खालील तक्त्यात नमूद अधिकाऱ्यांची बदलीने त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक- ३ मध्ये दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव व पदनाम | बदलीनंतरची पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| १ | श्री. भिकाजी मारूती कासार<br>उपशिक्षणाधिकारी (नि.शि.),<br>जि. प. कोल्हापूर | उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक),<br>जि. प. कोल्हापूर | प्रशासकीय कारणास्तव<br>रिक्त पदावर |

| अ.क्र. | नाव व पदनाम | बदलीनंतरची पदस्थापना | अभिप्राय |
|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ |
| २ | श्री. महोमाद्दीन काझी, उपशिक्षणाधिकारी (नि.शि.) जि. प. औरंगाबाद | उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि.प. औरंगाबाद | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर |
| ३ | श्रीमती अनुराधा रा. भंडारी, उपशिक्षणाधिकारी (नि.शि.), जि. प. लातूर | उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि. प. लातूर | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर |
| ४ | श्रीमती प्रिया म. देशमुख, उपशिक्षणाधिकारी (नि.शि.), जि. प. अमरावती | उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि. प. अमरावती | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर. |
| ५ | श्री. किसन पिराजी सोने, उपशिक्षणाधिकारी (नि.शि.), जि. प. यवतमाळ | उपशिक्षणाधिकारी (प्राथमिक), जि. प. यवतमाळ | प्रशासकीय कारणास्तव रिक्त पदावर. |

३. सदर अधिकाऱ्यांनी त्यांच्या नवीन पदाचा पदभार त्वरित स्विकारावा तसेच त्यांनी अनधिकृत रजेवर जाऊ नये. त्यांचे लक्ष सामान्य प्रशासन विभागाच्या क्रमांक-सीडीआर १०८२/२५६७/२८/ अकरा, दिनांक ३० ऑगस्ट १९९२ च्या परिपत्राकाकडे वेधण्यात येत आहे. त्यात दिलेल्या सूचना लक्षात घेऊन बदली रद्द करण्यासाठी कुठल्याही स्वरुपाची आवेदने सादर केल्यास, ते शिस्तभंगाच्या कारवाईस पात्र ठरतील याची संबंधितांनी नोंद घ्यावी.

४. आयुक्त (शिक्षण) पुणे यांनी या आदेशाप्रमाणे सदर अधिकाऱ्यांना त्यांच्या सध्याच्या पदभारातून तात्काळ कार्यमुक्त करण्याबाबत संबंधित नियंत्रण अधिकाऱ्यांना तातडीने कळवावे व बदली झालेले अधिकारी विहित कालावधीत दिलेल्या पदस्थापनेच्या ठिकाणी रुजू होतील, याची खातरजमा करावी व याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

५. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक क्रमांक २०१८१२१३१५३८५५५०२१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Ravindra Pralhad Ate

Digitally signed by Ravindra Pralhad Ate
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sport Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=fd5fc4fce5f6732e6657dca817ae6ee619a55d170d3c93eff53c3ca69d1a772d, serialNumber=eaa37af2edb5809b000f33d26328f6cdac80ee32afdac3f68b5821d14e41dffa, cn=Ravindra Pralhad Ate
Date: 2018.12.13 17:07:33 +05'30'

( र. प्र. आटे )

सह सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) आयुक्त, शिक्षण आयुक्तालय (मध्यवर्ती इमारत), महाराष्ट्र राज्य, पुणे
२) सर्व शिक्षण संचालक.
३) संबंधित जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी.
४) संबंधित विभागीय अध्यक्ष, महाराष्ट्र राज्य, माध्यमिक व उच्च माध्यमिक शिक्षण मंडळ.

५) संबधित शिक्षणाधिकारी (प्राथमिक/माध्यमिक/निरंतर शिक्षण) जिल्हा परिषद.
६) संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी.
७) संबंधित अधिकारी (आयुक्त (शिक्षण) यांचे कार्यालयामार्फत)

**प्रत माहितीसाठी,**

१) मा.मंत्री, शालेय शिक्षण यांचे विशेष कार्य अधिकारी.
२) अप्पर मुख्य सचिव, शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक
३) निवडनस्ती, प्रशा-२